# बॉंब आणि जनरल

उम्बर्तो इको



कोणे एके काळी
एक अणु होता.



आणि कोणे एके काळी
एक दुष्ट जनरल होता.
तो सोन्याच्या धाग्यांनी बनलेला
गणवेश घालत असे.



प्रत्येक वस्तू अणुंनी बनलेली आहे.

अणू खूप सूक्ष्म असतात
आणि जेव्हा ते एकत्र येतात
तेव्हा ते रेणू तयार करतात,
ज्यांच्यापासून जगातील
प्रत्येक वस्तू बनलेली आहे.

आई अणुंनी बनलेली आहे.
दूध अणुंनी बनलेले आहे.
स्त्री अणुंनी बनलेली आहे.
हवा अणुंनी बनलेली आहे.
आग अणुंनी बनलेली आहे.
आपण सगळे अणुंनी बनलेलो आहोत.



जेव्हा सर्व अणुंमध्ये
सुसंवाद असतो
तेव्हा सगळे काही ठिक-ठाक असते.
या सुसंवादामुळेच जीवन सुखी-समाधानी असते.

पण जेव्हा अणु फुटतो
तेव्हा त्याचे भाग इतर अणुंवर जाऊन आदळतात.
मग ते अणुसुद्धा फुटतात
आणि आणखी इतर अणुंवर आदळतात.
हे असेच चालू राहाते....
आणि अणुंमधील सुसंवाद संपतो

मग एक भयानक स्फोट होतो
आणि अणू मरण पावतो.



आपला अणु उदास का होता?
कारण त्याला अणुबाँबच्या आत
ठेवण्यात आले,
फुटण्यासाठी.
म्हणजे, तो मरणाच्या दारात पोहोचला!

इतर अणुंसमवेत
तो त्या दिवसाची वाट बघू लागला,
ज्या दिवशी बाँब टाकणार होते
आणि ते सगळे फुटणार होते
ते स्वत: तर नष्ट होणारच होते
पण इतरांचाही नाश करणार होते.



खरं सांगायचं तर,
आपले जग
सैन्यातील जनरलनी भरलेले आहे.
ते बॉंब गोळा करण्यात सारं आयुष्य घालवतात.

आपल्या जनरलनेही
त्याच्या घराच्या पोटमाळ्यावर
अणुबॉंबची रास रचलेली आहे.
“जेव्हा माझ्याकडे खूप सारे बॉंब असतील तेव्हा मी
एक सुंदर युद्ध सुरू करणार!”
असे म्हणत जनरल हसत असतो.

एवढे सारे बॉंब जर तुम्हाला मिळाले
तर तुम्हीसुद्धा क्रूर बनू शकता, नाही का?





बाँबच्या आत बंद असलेले अणू
खूप दु:खी होते.

त्यांचे खूप आभार
त्यांच्यामुळेच मोठी उलथापालथ होणार होती:
असंख्य लहान मुले मरणार होती,
असंख्य आया,
मांजरींची असंख्य पिल्ले,
असंख्य वासरे,
असंख्य पक्षी,
अगदी प्रत्येक जण.

हिरव्यागार झाडा-झुडपांमध्ये वसलेली
लालचुटुक छपरांची
टुमदार लहान लहान सफेद घरं असलेली,
सगळी शहरं नामशेष होणार होती....





....काहीच शिल्लक राहाणार नव्हते,
एका भेसूर काळ्या खड्ड्याशिवाय.



म्हणून मग
अणुंनी जनरलविरुद्ध
बंडखोरी करायचे ठरवले.

एके रात्री,
कसलाही आवाज न करता,
ते सर्व गुपचुप बाँबमधून बाहेर पडले
आणि तळघरात जाऊन लपले.



पुढल्या दिवशी सकाळी
जनरल काही माणसांना घेऊन
पोटमाळ्यावर आला.

ती माणसे म्हणाली:
“आम्ही हे बॉंब बनवण्यासाठी
खूप सारा पैसा ओतलाय.
त्यांना काय इथे असंच सडत ठेवायचं?
मग तुमच्यासारखा जनरलचा काय उपयोग?”

“खरंय!”
जनरल उत्तरला.
“खरंच, आपल्याला युद्ध सुरू करायला हवं.
नाहीतर माझी कारकीर्द धोक्यात येईल.”



आणि त्याने युद्धाची घोषणा केली....



अणुयुद्ध सुरू झाल्याची बातमी
सर्वत्र पसरली,
तेव्हा लोक भीतीने गारठून गेले:
“आपण जनरलला बॉंब बनवायची
परवानगी दिली नसती तर!”
ते उसासे सोडत म्हणू लागले.

पण खूप उशीर झाला होता.
सर्व लोक शहरं सोडून पळून गेले.
पण आश्रय तरी कुठे घ्यायचा?







दरम्यान जनरलने
सर्व बाँब एका विमानात चढवले
आणि एक-एक करून ते
सगळ्या शहरांवर टाकले.



पण जेव्हा बाँब खाली पडले
(त्यात अणु नसल्यामुळे ते रिकामे होते)
त्यांचा स्फोटच झाला नाही.
आपला जीव थोडक्यात बचावला
म्हणून लोक आनंदीत झाले.
(त्यांचा आपल्या नशीबावर विश्वासच बसेना!)
त्यांनी फुलदाण्या सजवण्यासाठी हे बाँब वापरले.

लोकांना प्रथमच जाणवले,
बाँब नसले तर आयुष्य जास्त सुंदर असते.



....मग लोकांनी पुन्हा युद्ध करायचे नाही, असे ठरवले.

आया खुश झाल्या.

आणि बाबासुद्धा.

सगळेच खुश झाले.



पण जनरलचे काय झाले?
कारण आता युद्ध कधीच होणार नव्हते.
त्याला जनरल पदावरून काढून टाकण्यात आले.




सोन्याच्या धाग्यांनी बनलेल्या गणवेशाचा उपयोग करण्यासाठी,
जनरल एका हॉटेलचा द्वारपाल बनला.
आता सर्व लोक सुखासमाधानाने जगत होते,
त्यामुळे बरेच पर्यटक हॉटेलमध्ये येऊ लागले,
अगदी जुने शत्रुसुद्धा!
आणि पूर्वी जनरलच्या हुकुमाचे ताबेदार असणारे सैनिकसुद्धा!



सैनिक हॉटेलमध्ये आले आणि पुन्हा बाहेर निघाले
की जनरल काचेचा मोठ्ठा दरवाजा उघडत असे
आणि विचित्रपणे झुकून त्यांना सलाम करत म्हणे,
“शुभदिन, सर!”
सैनिक (जे जनरलला ओळखत) जनरलकडे
कुत्सितपणे बघून म्हणत, “किती वाईट सेवा मिळते या हॉटेलात!
यांची वागणूक अपमानास्पद आहे!”

हे ऐकून जनरलचा चेहरा

लालेलाल होत असे.

पण तो शांत राहात असे.

कारण आता त्याला काही महत्त्वच उरले नव्हते.



समाप्त